**मंत्रालय सुरक्षा प्रकल्पा अंतर्गत मंत्रालय मुख्य इमारती मधील सुरक्षा व्यवस्थेशी संलग्न अदृश्य स्वरूपाची जाळी बसविण्याच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीईएस-०३२५/सं.क्र.११२/विशा-४**
मंत्रालय मुख्य इमारत, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १० जून, २०२५.

**संदर्भ:-** गृह विभाग, शासन निर्णय क्र. पीईएस ०११७/प्र.क्र.३२/विशा-४, दिनांक २६ .०९. २०२३

**प्रस्तावना:** मंत्रालय ही अत्यंत संवेदनशील व महत्त्वाची आस्थापना असल्याने सदर आस्थापनेची सुरक्षा ही अत्यंत महत्त्वाची बाब आहे. त्याअनुषंगाने मंत्रालय अंतर्गत सुरक्षा प्रकल्प राबविण्याचा निर्णय शासन स्तरावरुन घेण्यात आला आहे. शासन निर्णय क्र. पीईएस ०११७/प्र.क्र.३२/विशा-४, दिनांक २६ .०९. २०२३ अन्वये मंत्रालय सुरक्षेच्या अनुषंगाने सुधारित मार्गदर्शक सुचना निर्गमीत करण्यात आल्या आहेत. यामधील सुचना क्र.१९ अन्वये मंत्रालयाच्या मोकळया कॉरिडॉर मध्ये खिडक्यांमधून किंवा प्रत्येक मजल्यावरील मोकळया जागांमधून उडी मारण्याचा प्रयत्न अभ्यागतांमार्फत होऊ शकतो. अशा ठिकाणी Invisible steel Ropes लावण्याची कार्यवाही सार्वजनिक बांधकाम विभागाने एक महिन्यात करावी. अशी तरतुद नमुद असून त्यास अनुसरून सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत मंत्रालयातील मुख्य इमातीमध्ये Invisible steel Ropes लावण्यात आल्या आहेत.

२. सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत अदृश्य स्वरूपाची जाळी सकरत्या जिन्याजवळ तळमजला ते ७ वा मजला पर्यंत बसविण्याच्या कामासाठीच्या खर्च करण्यासाठीचे कामाचे अंदाजपत्रक खालीलप्रमाणे सादर करण्यात आले आहे.
Providing & Fixing Structural Steel, Invisible Grill, ACP Panelling for ७th Floor Passage and Ground to ७th Floor Escalators Main Building, Mantralaya, Mumbai.

३. सदर अंदाजपत्रकामध्ये कामाच्या भागाची अंदाजित रक्कम रु.४१,९६,७८५/- एवढी आहे. या कामाच्या अंदाजपत्रकामध्ये वरील बाबींव्यतिरिक्त इतर अनुषंगिक बाबी प्रस्तावित केलेल्या असून, इतर (१०% भाववाढ, ४% आकस्मिक खर्च, १% कामगार विमा, १८ % वस्तु व सेवा कर खर्च व 5% सेंटेज चार्जेस,इ) तरतूदींचा समावेश केला आहे. अंदाजपत्रकातील दर हे सन २०२२-२३ च्या राज्य दरसूचीतील दरांवर तसेच मंडळ कार्यालयाने मंजूर केलेल्या दरांवर आधारित असल्याचे नमुद केले आहे.

४. मंत्रालय मुख्य इमारतीमध्ये अदृश्य जाळी बसविण्यासाठीच्या सार्वजनिक बांधकाम विभागाने सादर केलल्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:** सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत मंत्रालय मुख्य इमारतीमध्ये अदृश्य जाळी (Invisible steel Ropes) बसविण्यासाठीच्या कामारिता लागणाऱ्या निधीबाबत सादर केलेल्या अंदाजपत्रकाप्रमाणे अंदाजे रक्कम रू.४१,९६,७८५ इतका निधी गृह विभागाकडून सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येणार आहे. अशा प्रकारे अंदाजे एकूण रू.४१,९६,७८५ ( रू. एक्केचाळीस लाख शहाण्णव हजार सातशे पंच्याऐंशी ) इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर बाबीवरील खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२६ करिता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा- मागणी क्र.बी-१, २०५५ – पोलीस, ११५ पोलीस दलाचे आधुनिकीकरण, ०१ विविध तंत्रज्ञान विकास प्रकल्प, (०७)मंत्रालय सुरक्षा प्रकल्प २०५५)ए(२९३ या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

३. सदरचा खर्च करण्यास उप सचिव (रोखशाखा), गृह विभाग यांना नियंत्रण अधिकारी, तसेच त्यांच्या अधिनस्त अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोखशाखा), गृह विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे. त्यांनी संबंधितांना निधी वितरणाची कार्यवाही करावी.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, उप विभाग-तीन. अ.क्र. परिच्छेद क्र.२७ (२) अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या पूर्ण अधिकारास अनुसरून निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१०१८००३९२९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN SAHEBRAO DHIKALE

Digitally signed by PRAVIN SAHEBRAO DHIKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=6d1bb8a730bc70c2cbcd0b01bab78ae17bc671feb580bcbbcd692fb0650b8855, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=C5958E733FEF41BD5DDD91B20A6E0AC739E081BB933D0189686449BE15147182, cn=PRAVIN SAHEBRAO DHIKALE
Date: 2025.06.10 18:01:59 +05'30'

**(डॉ. प्रविण ढिकले )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) विशेष पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई
५) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
७) पोलीस उपायुक्त, मंत्रालय सुरक्षा, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
९) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१०) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२) वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) उप सचिव (रोखशाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) अवर सचिव/कक्ष अधिकारी (रोखशाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती- विशा-४, गृह विभाग.